मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ. नरडाणा (ता. शिंदखेडा, जि. धुळे) प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०१६/प्र.क्र.९०/पापु-१९

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १८ मार्च, २०१७

वाचा

१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे यांचे पत्र क्र.धुजिप/ग्रापापु/तांशा/१९६/२०१७, दिनांक ०३ फ़ेब्रुवारी, २०१७
२) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, धुळे यांचे पत्र क्रमांक: धुजिप/ग्रापापु/तामं/४१३/२०१७, दिनांक १६ मार्च, २०१७
३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४(अ)/पापु-०७, दिनांक १७ मार्च, २०१०
४) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१२०८/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक ०९ ऑक्टोबर, २०१३
५) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११३/प्र.क्र.१५६/पापु-०७, दिनांक २२ जानेवारी, २०१४
६) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४
७) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १७ ऑक्टोबर, २०१४
८) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११५/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक १६ फ़ेब्रुवारी, २०१५
९) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-११११/प्र.क्र.१३४/पापु-०७, दिनांक २० फ़ेब्रुवारी, २०१५
१०) शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११४/प्र.क्र.५२/पापु-०७, दिनांक १० मार्च, २०१५
११) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७, दिनांक १५ जून, २०१५
१२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
१३) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-२११६/प्र.क्र.३९/पापु-१९, दिनांक २३ सप्टेंबर, २०१६

**प्रस्तावना:-**

मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ. नरडाणा (ता. शिंदखेडा, जि. धुळे) प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याबाबतची रु.१०९.३३ लाख इतक्या किंमतीची अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर करण्यात आली आहेत. सदर योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखड्यास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद, धुळे यांनी संदर्भाधीन

क्र.२ येथील आदेशान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. संदर्भाधीन क्र.१२ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांच्या पुनरुज्जीवनाची, पुढील देखभाल दुरुस्तीची, संचलन व सनियंत्रणाची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची आहे. परंतु मा. मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचेकडे आयोजित दि.०४.०१.२०१७ रोजीच्या बैठकीत सदर योजना पुनरुज्जीवित करण्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने असमर्थता दर्शविल्याने जिल्हा परिषदेच्या विनंतीनुसार सदर योजना जिल्हा परिषद, धुळे यांचेमार्फ़त पुनरुज्जीवित करण्याचा व चालविण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार सदर योजनेच्या रू.१०९.३३ लाख इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ. नरडाणा (ता. शिंदखेडा, जि. धुळे) प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजना पुनरुज्जीवित करण्याबाबतच्या रु.१०९.३३ लाख (अक्षरी रुपये एक कोटी नऊ लाख तेहतीस हजार फ़क्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या (सन २०१५-१६ च्या दरसुचीनूसार) अंदाजपत्रकास खालील अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

I. सदर योजनेची पुनरुज्जीवनाची, पुढील देखभाल दुरुस्तीची, संचलन व सनियंत्रणाची जबाबदारी जिल्हा परिषद, धुळे यांची राहील.

II. योजनेची कामे विहीत पध्दतीने ई- निविदा मागविण्यात येऊन करावीत. जादा किंमतीच्या निविदा स्वीकृत करु नयेत. योजनेचे काम प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीमध्येच पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी. योजनेची किंमत वाढल्यास त्याला राज्य शासन जबाबदार राहणार नाही.

III. योजनेचा उद्भव विकसित झाल्याशिवाय इतर कामे सुरु करु नयेत. उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.

IV. पाणीपुरवठा करण्यासाठी प्रत्येक गावाकरिता स्वतंत्र व्यवस्था करावी, जेणेकरुन पाणीपट्टीची रक्कम न भरल्यामुळे एखाद्या गावाचा पाणीपुरवठा बंद करावयाचा झाल्यास कोणतीही अडचण येणार नाही.

V. योजना चालविणे व देखभाल दुरूस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधित ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रस्तावामध्ये नमूद केल्यानुसार घरगुती,

बिगर घरगुती व संस्थात्मक नळ धारकासाठी पाणी पट्टीचा दर निश्चित करावा व त्यात कालपरत्वे वाढ करण्यात यावी.

VI. योजना चालविणे त्याचे परिरक्षण व देखभाल दुरुस्ती यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

VII. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळ जोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

VIII. कोणत्याही कारणाने खर्चात वाढ झाल्यास शासनाकडून अनुदान उपलब्ध करून देण्यात येणार नाही.

IX. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटींची पुर्तता करण्यात यावी. तसेच संदर्भाधीन क्र.१२ येथील दि.०७ मे, २०१६ च्या शासन निर्णयातील तरतुदीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

X. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी निश्चित करणे व त्यात आवश्यकतेनुसार वाढ करणे ग्रामपंचायतीस बंधनकारक राहील. याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिकाऱ्यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना स्पष्टपणे सविस्तर माहिती द्यावी व त्यानंतरच योजनेचे पुनरुज्जीवन हाती घेण्यात यावे.

XI. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जबाबदार संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र राहतील.

XII. योजनेच्या प्रगतीप्रमाणे खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेच्या पुर्णत्वाचे दाखले संबंधित अंमलबजावणी यंत्रणांकडून प्राप्त करुन घेवून शासनास सादर करण्याची जबाबदारी पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो), बेलापूर यांची राहील.

२. सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२)(२७) बंद पडलेल्या प्रादेशिक पाणीपुरवठा योजनांचे पुनरुज्जीवन (२२१५ ९९५१)- ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१८१२५२०९६२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2017.03.18 13:28:54 +05'30'

**(रा. अ. साबणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) विभागीय आयुक्त, नाशिक.
६) जिल्हाधिकारी, धुळे.
७) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे.
९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
१०) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, प्रादेशिक विभाग, नाशिक.
१२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१३) कार्यासन पापु-०४, पापु-०९, व पापु-२० पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) निवड नस्ती (पापु-१९)